**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्या अधिपत्याखालील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२१/प्र.क्र.७१/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०७ ऑक्टोबर, २०२१

वाचा : १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२१/प्र.क्र.१५/प्रशासन-१ दि. १२ मार्च, २०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. १० ऑगस्ट, २०२१
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे दि. ०६ ऑगस्ट, २०२१ रोजीचे पत्र.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांचे दि. १७ ऑगस्ट, २०२१ रोजीचे पत्र.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर यांचे दि. २३ ऑगस्ट, २०२१ रोजीचे पत्र.
६) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली यांचे दि. ०१ ऑक्टोबर, २०२१ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय -**

उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली यांच्याकडील अस्थायी पदे दि. ०१ मार्च, २०२१ ते ३१ ऑगस्ट, २०२१ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली यांच्या अधिपत्याखालील पुढील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे, रुपांतरित अस्थायी आस्थापनेवरील पदे, जिल्हा परिषद अस्थायी आस्थापनेवरील पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून **दिनांक ०१ सप्टेंबर, २०२१ पासून दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२** पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

| कार्यालयाचे नाव | नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे | जिल्हा परिषद आस्थापनेवरील पदे | रूपांतरित अस्थायी आस्थापनेवरील पदे |
|---|---|---|---|
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर | १४ | ० | ० |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर | १८१७ | ०४ | १८७ |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर | ९५४ | ०८ | ६१ |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली | ५१७ | ०९ | ५८ |

३. दि. २५ नोव्हेंबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत स्थापत्य शाखेतील क्षेत्रिय स्तरावरील नियमित संवर्गापैकी ३४ संवर्गातील पदांचा आणि दि. २२ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये उर्वरित ३५ पासून पुढील संवर्गातील पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. या शासन निर्णयातील तरतूदी/सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. या बाबीवरील खर्च मंडळ कार्यालयातील पदांसाठी २०५९-सार्वजनिक बांधकामे ८०- सर्वसाधारण, ००१- संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर) व विभाग/ उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०- सर्वसाधारण - ००१-संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर) लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. १० ऑगस्ट, २०२१ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११००७११४६२४१५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2021.10.07 11:48:19 +05'30'

**( वि. नि. ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**-१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३.महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर

५.वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
६.वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
७.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
८.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर
१०.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,गडचिरोली
११.संबंधित कोषागार / उप कोषागार अधिकारी
१२.कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अधिकारी, प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. (निवडनस्ती)